जिल्हा परिषद कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या ४३ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भनिनि-६९२३/प्र.क्र.३२/आस्था-१०**
बांधकाम भवन इमारत, १ ला मजला,
२५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २९ मे, २०२४.

वाचा :-

१) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: आयएमव्ही-१०७९/ (सीआर-२४-अ) २/४०, दि.०४/१२/१९८०.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक. टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१/०६/२००३.
३) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: जीपीएफ-१००७/प्र.क्र.१२/ आस्था-११, दि.०८/०३/२००७.
४) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: जीपीएफ १००८/प्र.क्र.१३/ आस्था-११, दि.२१/०२/२००८.
५) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: जीपीएफ-१००९ /प्र.क्र.२५ / आस्था-११, दि.२५/०३/२००९.
६) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग, क्रमांक: भनिनि-६९२१ /प्र.क्र.३८ /आस्था-१०, दि.२८/०२/२०२२.
७) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग, क्रमांक: भनिनि-६९२२/प्र.क्र.४५/आस्था-१०, दि.३१/०३/ २०२२
८) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग, क्रमांक: भनिनि-६९२२/प्र.क्र.४५/आस्था-१०, दि.१२/०४/ २०२३
९) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दि.३१/०८/२०२३.
१०) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्र. भनिनि-६९२३/प्र.क्र.३२/आस्था-१०, दि.२५/०९/२०२३
११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१९/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.

प्रस्तावना :-

जिल्हा परिषद कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवण्यासाठी विभागाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये एकूण १९९ पदांना मंजूरी दिली होती. त्यानंतर काही जादा पदे वगळून एकंदरीत २८३ पदांना शासन निर्णय दिनांक २२/८/१९८३ अन्वये मंजूरी देण्यात आली. त्यानंतर पुन्हा शासन निर्णय, दिनांक ३०/०६/२००३ अन्वये मा.मुख्य सचिव समितीने दिलेल्या सहमतीनुसार जिल्हा परिषदांच्या भविष्य निर्वाह निधीच्या कामासाठी सुधारीत आकृतिबंधानुसार एकूण २८६ पदांना जिल्हा

निहाय मंजुरी देण्यात आली. वरील संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक ०८/०३/२००७ नुसार जिल्हा परिषद कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२००७ ते दिनांक २१/०२/२००८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली. वित्त विभागाच्या दिनांक २८/०२/२००३ च्या पत्रात नमूद केल्याप्रमाणे, सदर योजनेतील पदांचा निश्चित करण्यात आलेल्या सुधारीत आकृतिबंधानुसार २८६ पदांपैकी उप लेखापाल-१२, वरिष्ठ सहाय्यक- ४५, कनिष्ठ सहाय्यक- १५७ व परिचर- २९ अशा एकूण २४३ पदांना स्थायी करण्यास व कनिष्ठ सहाय्यकांच्या २०० पदांपैकी (१५७ स्थायी पदे वगळून) ४३ अस्थायी पदांना उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयानुसार वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली होती. सदरहू कनिष्ठ सहाय्यकांच्या ४३ अस्थायी पदांना यापूर्वी या विभागाच्या संदर्भ क्र.८ येथील दिनांक १२/०४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०३/२०२३ ते दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली होती. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ९ येथील दि. ३१/०८/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०९/२०२३ ते दिनांक २८/०२/२०२४ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

वित्त विभागाच्या दिनांक २८/०२/२००३ च्या पत्रात नमूद केल्याप्रमाणे, सदर योजनेतील पदांचा निश्चित करण्यात आलेल्या सुधारीत आकृतिबंधानुसार २८६ पदांपैकी उप लेखापाल-१२, वरिष्ठ सहाय्यक- ४५, कनिष्ठ सहाय्यक- १५७ व परिचर- २९ अशा एकूण २४३ पदांना स्थायी करण्यास व कनिष्ठ सहाय्यकांच्या २०० पदांपैकी (१५७ स्थायी पदे वगळून) ४३ अस्थायी पदांना उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयानुसार वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली होती. सदरहू कनिष्ठ सहाय्यकांच्या ४३ अस्थायी पदांना यापूर्वी या विभागाच्या संदर्भ क्र.१० येथील दिनांक २५/०९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०९/२०२३ ते दिनांक २८/०२/२०२४ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली होती. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ११ येथील दि. २१/०२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या सोबतच्या प्रपत्रातील कनिष्ठ सहाय्यकांच्या ४३ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ पर्यंतच्या कालावधीसाठी या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात येत आहे. सदरच्या अस्थायी पदांची मुदतवाढ ही शेवटची मुदतवाढ समजण्यात यावी.

२. या पदांच्या वेतन व भत्ते यासाठी होणारा खर्च "२०५३ - जिल्हा प्रशासन ०९३ / जिल्हा आस्थापना (५) स्थानिक क्षेत्रातील योजना महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ चे कलम १८३ अन्वये अनुदाने (आस्थापना अनुदाने) (सहाय्यक अनुदाने) (स्थानिक क्षेत्र) जिल्हा परिषद कमर्चा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या खात्याच्या परिक्षणाकरिता कर्मचारी वर्ग या

लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात येऊन चालू वर्षासाठी उपलब्ध झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५२९१२२७०५७१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJAY KACHRUJI PAWAR

Digitally signed by AJAY KACHRUJI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=2fa427e9f588f6677123583b3a1fc1ffcd6f1bdf7b78ab36007e8fe1b9734a2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=674E6B4DB780032BD9C36DA5EA357A93C3F4FF3BBC01CC368CC3A1756AED4857, cn=AJAY KACHRUJI PAWAR
Date: 2024.05.29 16:00:38 +05'30'

**(अजय क. पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री(ग्रा.वि.) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
२. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
४. सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय.
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई /नागपूर (५ जादा प्रतींसह)
६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र, मुंबई (१५ जादा प्रतींसह)
९. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१०.वित्त विभाग-व्यय-५/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन आस्था-८, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
१२.निवड नस्ती आस्था-१०.

प्रपत्र
शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. भनिनि-६९२३/प्र.क्र.३२/आस्था-१०,
दिनांक - २९ मे, २०२४

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | कनिष्ठ सहाय्यक | | |
|---|---|---|---|---|
| | | मंजूर पदे | स्थायी | अस्थायी |
| १. | ठाणे | ८ | ६ | २ |
| २. | रायगड | ८ | ६ | २ |
| ३. | रत्नागिरी | ७ | ६ | १ |
| ४. | सिंधुदुर्ग | ४ | ३ | १ |
| ५. | नाशिक | ९ | ७ | २ |
| ६. | धुळे | ३ | २ | १ |
| ७. | नंदुरबार | ४ | ३ | १ |
| ८. | जळगांव | ११ | ९ | २ |
| ९. | अहमदनगर | ५ | ४ | १ |
| १०. | पुणे | ११ | ९ | २ |
| ११. | सातारा | ३ | २ | १ |
| १२. | सांगली | ८ | ६ | २ |
| १३. | सोलापूर | ४ | ३ | १ |
| १४. | कोल्हापूर | ४ | ३ | १ |
| १५. | औरंगाबाद | ७ | ६ | १ |
| १६. | जालना | ४ | ३ | १ |
| १७. | परभणी | ४ | ३ | १ |
| १८. | हिंगोली | ४ | ३ | १ |
| १९. | बीड | ८ | ६ | २ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २०. | नांदेड | ९ | ७ | २ |
| २१. | उस्मानाबाद | ५ | ४ | १ |
| २२. | लातूर | ७ | ६ | १ |
| २३. | बुलढाणा | ८ | ६ | २ |
| २४. | अकोला | ४ | ३ | १ |
| २५. | वाशिम | ५ | ४ | १ |
| २६. | अमरावती | ९ | ७ | २ |
| २७. | यवतमाळ | १० | ८ | २ |
| २८. | वर्धा | ४ | ३ | १ |
| २९. | नागपूर | ७ | ६ | १ |
| ३०. | भंडारा | ४ | ३ | १ |
| ३१. | गोंदिया | ५ | ४ | १ |
| ३२. | चंद्रपूर | ६ | ५ | १ |
| ३३. | गडचिरोली | २ | २ | ० |
| | **एकूण** | **२००** | **१५७** | **४३** |

AJAY KACHRUJI PAWAR

Digitally signed by AJAY KACHRUJI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=2fa427e9f588f6677123583b3a1fc1ffcd6f1bdf7b78ab36007e8fe1b9734a2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=674E6B4DB780032BD9C36DA5EA357A93C3F4FF3BBC01CC368CC3A1756AED4857, cn=AJAY KACHRUJI PAWAR
Date: 2024.05.29 16:01:03 +05'30'

(अजय क. पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन